रब्बी हंगामातील दुष्काळाचे मुल्यांकन करण्याच्या
निकषामध्ये व कार्यपध्दतीमध्ये सुधारणा करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय - २०१८/प्र.क.२३७/म-७**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ११ फेब्रुवारी, २०१९

**संदर्भ: -**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक: एससीवाय - २०१३ / प्र.क्र.२०७ / म-७, दिनांक ३.११.२०१५
२) दुष्काळ व्यवस्थापन संहिता, २०१६ ( Manual for Drought Management 2016 )
३) शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक ७ ऑक्टोबर, २०१७
४) शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक २८ जून, २०१८
५) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक ०३-०१/२०१८-डीएम-१, दिनांक : २३.०७.२०१८

**प्रस्तावना -**

केंद्र शासनाने प्रकाशित केलेल्या दुष्काळ व्यवस्थापन संहिता, २०१६ मधील तरतुदी व निकष विचारात घेवून राज्यामध्ये दुष्काळ जाहीर करण्यासाठी शास्त्रीय निकष व सुधारित कार्यपध्दती संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयानुसार विहित करण्यात आली आहे. सदर कार्यपध्दतीनुसार सन २०१७ च्या खरीप व रब्बी हंगामामध्ये दुष्काळाचे मुल्यांकन करण्याची कार्यवाही करण्यात आलेली आहे. दुष्काळ व्यवस्थापन संहिता,२०१६ मधील दुष्काळ घोषित करण्यासाठी विहित करण्यात आलेल्या निकषाबाबत विविध राज्यांनी व्यक्त केलेली मते विचारात घेवून केंद्र शासनाने संदर्भाधीन क्रमांक ४ येथील पत्रान्वये दुष्काळ व्यवस्थापन संहिता,२०१६ मध्ये दुष्काळ मुल्यांकनासंदर्भातील निकषामध्ये काही सुधारण केलेल्या आहेत. तसेच संदर्भाधीन क्रमांक ५ येथील पत्रान्वये केंद्र शासनाने रब्बी हंगामात दुष्काळाचे मुल्यांकन करण्यासंदर्भात सुधारित निकष व कार्यपध्दती विहित केली आहे. सदर सुधारणा विचारात घेवून राज्यामध्ये रब्बी हंगामातील दुष्काळाचे मुल्यांकन करण्याबाबत दिनांक ७.१०.२०१७ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या कार्यपध्दती व सुचनांमध्ये सुधारणा करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये रब्बी हंगामातील दुष्काळाचे मुल्यांकन करण्यासाठी विहित केलेले निकष व कार्यपध्दती या शासन निर्णयान्वये सुधारित करण्यात येत असून रब्बी हंगाम २०१८-१९ पासून पुढे देण्यात आलेल्या निकषानुसार व कार्यपध्दतीप्रमाणे राज्यामध्ये रब्बी हंगामातील दुष्काळाचे मुल्यांकन करण्याची कार्यवाही जिल्हास्तरीय व राज्यस्तरीय दुष्काळ मुल्यांकन समिती यांनी करावी. दुष्काळी मुल्यांकनाची जिल्हयांची माहिती राज्यस्तरीय दुष्काळ देखरेख समितीकडे सादर

करण्यासाठी सुधारित विवरणपत्र-ब व विवरणपत्र-क सोबत जोडले आहेत. सुधारित विवरणपत्रामध्ये रब्बी हंगामातील दुष्काळी मुल्यांकनाचा तपशील विहित कालमर्यादेत राज्यस्तरीय दुष्काळ देखरेख समितीकडे पाठविण्याची कार्यवाही करण्यात यावी.

२. पीक पैसेवारी बाबत निर्गमित केलेल्या दिनांक ३.११.२०१५ च्या शासन निर्णयातील परिच्छेद (१०) नुसार ***"सर्व खरीप गावामध्ये खरीप हंगामामध्ये पैसेवारी घोषित करण्यात यावी. रब्बी गावामध्ये खरीप हंगामात २/३ किंवा त्यापेक्षा जास्त क्षेत्रावर पेरणी करण्यात आली असेल तर त्या रब्बी गावांच्या सुध्दा खरीप हंगामामध्ये पैसेवारी घोषित करण्यात यावी. इतर सर्व रब्बी गावामध्ये रब्बी हंगामात पैसेवारी घोषित करण्यात यावी "*** अशा सुचना दिलेल्या आहेत. त्यामुळे ज्या रब्बी गावांची पैसेवारी रब्बी हंगामात घोषित केली जाते अशी गावे ज्या तालुक्यामध्ये समाविष्ट आहेत केवळ अशाच तालुक्यांचे रब्बी हंगामात दुष्काळासाठी मुल्यांकन करण्यात यावे.

३. राज्यामध्ये रब्बी हंगामात प्रमुख पिक घेण्याच्या खालील दोन प्रमुख परिस्थिती/पध्दती अस्तित्वात आहेत. त्यानुसार रब्बी हंगामात पैसेवारी घोषित केल्या जाणारी गावे समाविष्ट असणाऱ्या तालुक्यांचे खालील प्रमुख पिक परिस्थिती/पध्दतीनुसार वर्गवारी करून सर्व जिल्हाधिकारी यांचेकडून माहिती प्राप्त करून घेण्यात आली आहे.

| परिस्थिती /पध्दती क्रमांक | परिस्थिती / पध्दती | प्रमुख पीकाचा हंगाम |
|---|---|---|
| १ | जमीनीतील शिल्लक असलेल्या ओलाव्यावर आधारित घेतली जाणारी जिरायत पिके | ऑक्टोबर ते जानेवारी |
| २. | भूजलावर आधारित (विहिर,बोअरवेल इ.) घेतली जाणारी पिके | ऑक्टोबर ते एप्रिल |

वर नमूद केलेली पिक परिस्थिती/पध्दती विचारात घेवून राज्यातील रब्बी तालुक्यांचे या परिस्थिती/पध्दतीनुसार करण्यात आलेले वर्गीकरण या शासन निर्णयासोबत जोडलेल्या **विवरणपत्र-अ** मध्ये दर्शविण्यात आले आहे. विवरणपत्र-अ मध्ये दर्शविलेल्या रब्बी तालुक्यांचेच त्यांच्या वर्गवारीप्रमाणे (परिस्थिती/पध्दत क्रमांक १ अथवा २) रब्बी हंगामातील दुष्काळाचे मुल्यांकन करण्यात यावे. यासाठी पिक परिस्थिती/पध्दत नुसार राज्यातील तालुक्यांचे परिस्थिती /पध्दती क्रमांक १ अथवा २ यामध्ये वर्गीकरण करण्यात आलेल्या तालुक्यांसाठी त्या त्या परिस्थिती/पध्दतीनुसार खाली नमूद केल्याप्रमाणे अनिवार्य निर्देशांक व प्रभावदर्शक निर्देशांक लागू राहतील.

## ४. रब्बी हंगामातील दुष्काळाचे मुल्यांकन करण्यासाठी अनिवार्य निर्देशांक (Mandatory Indicator)

| परिस्थिती /पध्दती क्रमांक | **परिस्थिती / पध्दती** | **अनिवार्य निर्देशांक ( Mandatory Indicator )** |
|---|---|---|
| १ | जमीनीत शिल्लक असलेल्या ओलाव्यावर घेतली जाणारी पिके | सप्टेंबर ते डिसेंबर या कालावधीतील पर्जन्याचे विचलन व पावसातील खंड |
| २ | भूजलावर आधारित घेतली जाणारी पिके | भूजल पातळी निर्देशांक (Ground Water Drought Index) (मान्सून कालावधीनंतरचे) |

## ५. रब्बी तालुक्यांचे रब्बी हंगामात दुष्काळाचे मुल्यांकन करण्यासाठी लागू असलेले प्रभावदर्शक निर्देशांक ( Impact Indicators)

| परिस्थिती /पध्दती क्रमांक | **परिस्थिती /पध्दती** | **प्रभावदर्शक निर्देशांक ( Impact Indicators)** |
|---|---|---|
| १ | जमीनीत शिल्लक असलेल्या ओलाव्यावर घेतली जाणारी पिके | १. लागवडीखालील क्षेत्र (crop Sown Area)<br>२. मृदू आर्दता निर्देशांक (Moisture Adequacy Index) किंवा Percent Available Soil Moisture (PASM)<br>३.दूरसंवेदनावर आधारित NDVI/NDWI किंवा VCI |
| २ | भूजलावर आधारित घेतली जाणारी पिके | १. लागवडीखालील क्षेत्र (Crop Sown Area )<br>२. दूरसंवेदनावर आधारित NDVI/NDWI किंवा VCI |

६. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र - अ मध्ये करण्यात आलेल्या वर्गीकरणानुसार विहित केलेल्या तालुक्यांसाठी वरील परिच्छेद क्रमांक ४ व ५ मध्ये परिस्थिती/पध्दती क्रमांक १ अथवा क्रमांक २ समोर नमूद करण्यात आलेल्या अनिवार्य व प्रभावदर्शक निर्देशांकाचाच उपयोग करण्यात यावा.

७. अनिवार्य व प्रभावदर्शक निर्देशांकाचे मुल्य/संख्या व सदर मुल्य/संख्येनुसार निर्देशांकाची दुष्काळी वर्गवारी संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णय व प्रभावदर्शक निर्देशांकासाठी संदर्भाधीन क्रमांक ४ येथील शासन निर्णयान्वये विहित केल्याप्रमाणे राहील.

## ८. रब्बी हंगामातील दुष्काळ मुल्यांकन करण्यामधील टप्पे ( Steps in Drought Determination )

### अ) . पहिला टप्पा ( टप्पा १ ) :- अनिवार्य निर्देशांकाचे ( पर्जन्यमानाशी निगडीत) मुल्यांकन ( Trigger-१)

अनिवार्य निर्देशांकाचे (पर्जन्यमानाशी निगडीत) मुल्यांकन खालील प्रमाणे करून दुष्काळाची पहिली कळ (Trigger- १) लागू होणारे तालुके निश्चित करण्यात यावे.

| रब्बी हंगामातील पिक परिस्थिती/पध्दती | अनिवार्य निर्देशांक | अट | दुष्काळाची पहिली कळ (Drought Trigger) |
|---|---|---|---|
| **परिस्थिती/पध्दती क्रमांक १** जमीनीत शिल्लक असलेल्या ओलाव्यावर घेतली जाणारी पिके | सप्टेंबर ते डिसेंबर या कालावधीतील पर्जन्याचे विचलन व पावसातील खंड | पर्जन्यमानात तूट किंवा अत्यल्प पर्जन्यमान व पर्जन्यात सलग ३ ते ४ आठवडयाचा खंड | होय |
| | | पर्जन्यमानात तूट किंवा अत्यल्प पर्जन्यमान परंतु पर्जन्यात सलग ३ ते ४ आठवडयाच्या खंड नाही | केवळ पर्जन्यमान अत्यल्प असल्यास " होय ". |
| | | सामान्य पर्जन्यमान परंतु पर्जन्यात सलग ३ ते ४ आठवडयाचा खंड | होय |
| | | सामान्य पर्जन्यमान परंतु पर्जन्यात सलग ३ ते ४ आठवडयाच्या खंड नाही | नाही |
| **परिस्थिती/पध्दती क्रमांक २** भूजलावर आधारित घेतली जाणारी पिके | मान्सून कालावधीनंतरचे भूजल पातळी निर्देशांक (Ground Water Drought Index) | भूजल पातळी निर्देशांक -३०% किंवा त्यापेक्षा कमी असल्यास | होय |

**स्पष्टीकरण -**

१. सामान्य पर्जन्यमान = पर्जन्याचे विचलन +१९% ते -१९%
२. पर्जन्यमानात तूट = पर्जन्याचे विचलन - २०% ते - ५९%
३. अत्यल्प पर्जन्यमान = पर्जन्याचे विचलन - ६०% ते - ९९%
४. पर्जन्यातील खंड म्हणजे मान्सून सूरू झाल्यानंतर आठवडयातील **सरासरी** पर्जन्यापेक्षा **५०% ने कमी पर्जन्य झालेल्या सलग** ३ ते ४ आठवडयाचा कालावधी (हलकी जमीन ३ आठवडे व भारी जमीन ४ आठवडे)
५. **पर्जन्यमानाचे विचलन (RFdev)** = [(वर्तमान पर्जन्य - सरासरी पर्जन्य) / सरासरी पर्जन्य ] x१००

(पर्जन्यमान मिलीमीटरमध्ये)

**ब) <u>दुसरा टप्पा</u> :- दुष्काळाची पहिली कळ (Trigger-१) लागू झालेल्या तालुक्यातील प्रभावदर्शक निर्देशांकांचे मुल्यांकन (टप्पा २ ) (Trigger-२)**

वरील उप परिच्छेद (अ) नुसार दुष्काळाची पहिली कळ लागू झालेल्या तालुक्यांचे खालील प्रभावदर्शक निर्देशांकानुसार मुल्यांकन करून दुष्काळाची दुसरी कळ (Trigger-२) लागू होणारे तालुके निश्चित करण्यात यावे. या टप्प्यातील मुल्यांकनासाठी परिस्थिती/पध्दती क्रमांकानुसार लागू असणारे प्रभावदर्शक निर्देशांक खालीलप्रमाणे राहतील.

| **रब्बी हंगामातील पिक परिस्थिती/पध्दती** | **मुल्यांकनासाठी लागू असलेले प्रभावदर्शक निर्देशांक** | | | |
|---|---|---|---|---|
| | **लागवडीखालील क्षेत्र** | **<u>दूरसंवेदन विषयक निर्देशांक</u>** <u>NDVI/NDWI किंवा VCI</u> | मृदु आर्द्रता निर्देशांक (MAI) किंवा Percent Available Soil Moisture (PASM) | **जलविषयक निर्देशांक** (GWDI ) |
| **<u>परिस्थिती/पध्दती क्रमांक १</u>** जमीनीत शिल्लक असलेल्या ओलाव्यावर घेतली जाणारी पिके | लागू आहे ✓ | लागू आहे ✓ | लागू आहे. ✓ | **लागू नाही** ( X ) |
| **<u>परिस्थिती/पध्दती क्रमांक २</u>** भूजलावर आधारित घेतली जाणारी पिके | लागू आहे ✓ | लागू आहे ✓ | **लागू नाही** ( X ) | **लागू नाही** ( X ) |

**क) दुष्काळी परिस्थितीचे मुल्यांकन (टप्पा २ ) (Trigger-२) :**

- परिस्थिती/पध्दती क्रमांक १ साठी लागू असलेल्या ३ प्रभावदर्शक निर्देशांकापैकी कोणतेही २ निर्देशांक गंभीर प्रकारात असल्यास गंभीर दुष्काळ दर्शवितो व त्यामुळे दुष्काळाची दुसरी कळ लागू होईल; ३ प्रभावदर्शक निर्देशांकापैकी कोणताही एक निर्देशांक गंभीर व एक निर्देशांक मध्यम प्रकारात असल्यास किंवा दोन निर्देशांक मध्यम प्रकारात असल्यास मध्यम दुष्काळ दर्शवितो व त्यामुळे दुष्काळाची दुसरी कळ लागू होईल.
- परिस्थिती/पध्दती क्रमांक २ साठी लागू असलेल्या २ प्रभावदर्शक निर्देशांकापैकी कोणतेही एक निर्देशांक गंभीर प्रकारात असल्यास गंभीर दुष्काळा दर्शवितो व त्यामुळे दुष्काळाची दुसरी कळ लागू होईल किंवा दोन्ही प्रभावदर्शक निर्देशांक मध्यम प्रकारात असल्यास मध्यम दुष्काळ दर्शवितो व त्यामुळे दुष्काळाची दुसरी कळ लागू होईल.

**ड) तिसरा टप्पा :- क्षेत्रीय सर्वेक्षण - ( Gound Truthing or Verification )**

- दुष्काळाची दुसरी कळ लागू झालेल्या तालुक्यामधील रब्बी गावापैकी १०% गावे रॅन्डम पध्दतीने निवडून अशा गावांमधील पिकांचे क्षेत्रीय सर्वेक्षण ( Ground Truthing or Verification) करण्यात यावे. यासंदर्भात संदर्भाधीन क्रमांक ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये दिलेल्या सुचनेनुसारच क्षेत्रीय सर्वेक्षण (Ground Truthing) करण्यात यावे. हे सर्वेक्षण Maha-MADAT मोबाईल ॲप वापरून करण्यात यावे.

९. दुष्काळ मुल्यांकनांच्या टप्पा-१ व टप्पा-२ ची कार्यवाही करण्यासाठी Maha-MADAT ही संगणकीय प्रणाली विकसित करण्यात आली आहे. सदर प्रणाली मार्फत संबंधित जिल्हास्तरीय दुष्काळ देखरेख समितीने त्यांच्या जिल्हयातील Trigger-१ व Trigger-२ लागू झालेल्या तालुक्यांची यादी निर्माण (generate) करावी व त्याआधारे दुष्काळी परिस्थितीवर देखरेख ठेवावी व त्याबाबतचा अहवाल राज्यस्तरीय दुष्काळ देखरेख समितीकडे Trigger-१ अथवा Trigger-२ तालुक्यांच्या यादीसह सोबत जोडलेल्या विवरणपत्र- ब व विवरणपत्र-क येथील नमुन्यात पाठवावा. ज्या तालुक्यात दुष्काळाची दुसरी कळ लागू होईल त्या तालुक्यांचे तिसऱ्या टप्प्यानुसार प्रचलित पध्दतीप्रमाणे Maha-MADAT मोबाईल ॲप वापरून क्षेत्रिय सर्वेक्षण (Ground Truthing) करण्यात यावे.

**१०.** रब्बी हंगामात दुष्काळाचे मुल्यांकन तालुकास्तरावर करण्यात येत असले व त्यानुसार संबंधित तालुका दुष्काळग्रस्त म्हणून घोषित झाल्यानंतर सदर तालुक्यातील रब्बी गावांमध्येच दुष्काळ असल्याचे समजण्यात यावे.

**११.** खरीप हंगामातील दुष्काळाचे मुल्यांकन करण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक ३ येथील दिनांक ७.१०.२०१७ च्या शासन निर्णयान्वये सुचना देण्यात आलेल्या आहेत. सदर शासन निर्णयातील अनिवार्य निर्देशांका संदर्भातील परिच्छेद क्रमांक २.१. अ) मधील (iii) व (iv) रद्द करण्यात येत आहेत. परिणामी त्याच शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक ३ मधील पहिल्या टप्पामध्ये दर्शविलेल्या सारणीतील शेवटच्या दोन पंक्ती (row) रद्द होतील. म्हणजेच जनू व जूलै या महिन्यामधील पर्जन्य सरासरीच्या ५०% पेक्षा कमी असणे तसेच जून ते सप्टेंबर या कालावधीत पर्जन्य सरासरीच्या ७५% पेक्षा कमी असणे या दोन्ही बाबी खरीप हंगामातील दुष्काळाच्या मुल्यांकनासाठी अनिवार्य निर्देशांक म्हणून वापरण्यात येऊ नयेत.

**१२.** खरीप हंगामात दुष्काळ घोषित करण्याबाबतची कार्यपध्दती विहित करण्यात आलेल्या दिनांक ७.१०.२०१७ च्या संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक ३ मधील परिच्छेद क्रमांक ४ सुधारित करण्यात येत असून खरीप हंगामात दुष्काळ घोषित करण्यासाठी तालुका हा घटक राहणार आहे.

**१३.** उपरोक्त सुधारणा विचारात घेवून सर्व संबंधितांनी काटेकोरपणे कार्यवाही करावी व विहित कालावधीत अहवाल शासनास पाठवावेत जेणेकरून दुष्काळाची परिस्थिती असल्यास विहित केलेल्या कालावधीत राज्यामध्ये खरीप किंवा रब्बी हंगामामध्ये दुष्काळ घोषित करण्याची कार्यवाही करता येईल.

**१४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१११११२०५४१८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2019.02.11 11:23:52 +05'30'

**( सु.ह.उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन,मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,मंत्रालय,मुंबई,
३. मा विरोधी पक्ष नेते, विधानसभा/विधान परिषद, विधानभवन,मुंबई,
४. महाराष्ट्र विधानमंडळातील सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य,
५. मा.मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
७. अपर मुख्य सचिव (महसूल), महसुल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई
८. अपर मुख्य सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई,
९. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग
१०. विभागीय आयुक्त,कोकण/पुणे/औरंगाबाद/नागपूर/अमरावती/नाशिक
११. आयुक्त (कृषी),महाराष्ट्र राज्य,पुणे,
१२. आयुक्त (पशुसंवर्धन),महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. मुख्य अभियंता,जलविज्ञान प्रकल्प, नाशिक
१४. सर्व जिल्हाधिकारी
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी,सर्व जिल्हा परिषद
१६. सर्व निवासी जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हास्तरीय दुष्काळ देखरेख समिती,

१७. जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)

१८. संचालक, महाराष्ट्र रिमोट सेन्सिंग अप्लीकेशन सेंटर,नागपूर,

१९. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे,

२०. संचालक (कृषी),महाराष्ट्र राज्य,पुणे

२१. संचालक,आपत्ती व्यवस्थापन,मंत्रालय,मुंबई

२२. मा.मंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई

२३. मा.राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई

२४. निवड नस्ती (कार्यासन म - ७).

शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय - २०१८/प्र.क.२३७/म-७, दिनांक: ११ फेब्रुवारी, २०१९

**विवरणपत्र-अ**

रब्बी हंगामात घेतली जाणाऱ्या प्रमुख पिकांची परिस्थिती /पध्दती

| **परिस्थिती/पध्दती क्रमांक** | **परिस्थिती/पध्दती** | **प्रमुख पीकाचा हंगाम** |
|---|---|---|
| १ | जमीनीतील शिल्लक असलेल्या ओलाव्यावर आधारित घेतली जाणारी जिरायत पिके | ऑक्टोबर ते जानेवारी |
| २. | भूजलावर आधारित (विहिर,बोअरवेल इ.) घेतली जाणारी पिके | ऑक्टोबर ते एप्रिल |

**रब्बी हंगामात घेतल्या जाणाऱ्या प्रमुख पिकांची वर नमूद केलेली परिस्थिती/पध्दती विचारात घेवून राज्यातील रब्बी तालुक्यांचे केलेले वर्गीकरण**

**परिस्थिती/पध्दती क्रमांक १ : जमीनीत शिल्लक असलेल्या ओलाव्यावर सप्टेंबर/ऑक्टोबर ते जानेवारी या कालावधीत जिरायत पिके घेणारे तालुके**

| **अ.क्र.** | **जिल्हा** | **तालुके** |
|---|---|---|
| १ | अहमदनगर | अहमदनगर |
| २ | | पारनेर |
| ३ | | पाथर्डी |
| ४ | | कर्जत |
| ५ | | जामखेड |
| ६ | | शेवगांव |
| ७ | | कोपरगांव |
| ८ | पुणे | आंबेगाव |
| ९ | | भोर |
| १० | | पुरंदर |
| ११ | | बारामती |
| १२ | सातारा | खंडाळा |
| १३ | सांगली | जत |
| १४ | | आटपाडी |
| १५ | सोलापूर | उत्तर सोलापूर |

| | | |
|---|---|---|
| १६ | | बार्शी |
| १७ | | दक्षिण सोलापूर |
| १८ | | अक्कलकोट |
| १९ | | पंढरपूर |
| २० | | माहोळ |
| २१ | | मंगळवेढा |
| २२ | | सागोला |
| २३ | | माढा |
| २४ | | करमाळा |
| २५ | | माळशिरस |
| २६ | चंद्रपूर | बल्लारपूर |
| २७ | गडचिरोली | चामोर्शी |
| २८ | | अहेरी |
| २९ | | सिरोंचा |

**परिस्थिती/पध्दती क्रमांक २ : भूजलावर आधारित (विहिरी, बोअरवेल इ.) ऑक्टोबर ते एपिल या कालावधीत पिके घेणारे तालुके**

| अ.क्र. | जिल्हा | तालुके |
|---|---|---|
| १ | अहमदनगर | श्रीगोंदा |
| २ | | श्रीरामपूर |
| ३ | | नेवासा |
| ४ | | राहुरी |
| ५ | | राहाता |
| ६ | पुणे | हवेली |
| ७ | | वेल्हे |
| ८ | | दौंड |
| ९ | | शिरूर |
| १० | | जुन्नर |
| ११ | | मावळ |
| १२ | | इंदापूर |
| १३ | सातारा | फलटण |
| १४ | भंडारा | पवनी |

शासन निर्णय क्रमांक :- एससीवाय - २०१८/प्र.क.२३७/म-७, दिनांक: ११ फेब्रुवारी, २०१९

विवरणपत्र - ब

| Monitoring of Mandatory Indicator for Drought Assessment during Rabbi Season in Maharashtra | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| PROFORMA - A | | | | | | |
| | | Mandatory Indicators | | | | |
| **District** | **Taluka** | Rainfall Deviation . Rainfall deviation (Rfdev)= (Rfi-RFn)/RFn x 100 | Category of Rainfall Deviation Normal/Deficient/ Scanty | Dry Spell of 4 weeks (upto 3 weeks in case of light soils) Yes /No and mention the period of dry spell | Ground water Drought Index (GWDI) | Drought Trigger Yes/ No |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |

शासन निर्णय क्रमांक: एससीवाय - २०१८/प्र.क.२३७/म-७, दिनांक: ११ फेब्रुवारी, २०१९

## विवरणपत्र – क

| Monitoring of Impact Indicators for Drought Assessment during Rabbi Season in Maharashtra | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **PROFORMA-B** | | | | | | | | | | | | | | | | | |
| Name of Taluka where the Drought Trigger 1 is Yes as per PROFORMA - A | | **Impact Indicators** | | | | | | | | | | | | | | | |
| | | **Agriculture Related Index** | | | | **Remote Sensing based Index** | | | | | | | | | **Soil Moisture based Index** | | **Drought Trigger-2 Yes/No** |
| **District** | **Taluka** | **Actual Crop area sown (Talukawise) by the end of December (in hect.)** | **Normal sown area (Talukawise ) by the end of December (in hect.)** | **Percentage of CAS** | **Category (Normal/ Moderate / Severe)** | **VCI (NDVI)** | **VCI (NDWI)** | **Poorer of the two values of VCI (NDVI) and VCI(NDWI)** | **Category of VCI (Normal/Moderate/Severe)** | **NDVI Deviation** | **Category of NDVI (Normal /Moderate/ Severe)** | **NDWI Deviation** | **Category of NDWI (Normal/ Moderate/ Severe)** | **Poorer of the two values of NDVI and NDWI deviations** | **Percent Available Soil Moisture (PASM)** | **Category (Normal /Mild/ Moderate /Severe)** | |
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 | 11 | 12 | 13 | 14 | 15 | 16 | 17 | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | | | | | | |